**बेडा जंगम, बुडगा जंगम, माला जंगम या उप जातीच्या व्यक्तींना अनुसूचित जातीचे प्रमाणपत्र देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक :- सीबीसी-१०/२००३/प्र.क्र. १३३ /मावक-५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १२ नोव्हेंबर, २००३**

**वाचा :- १) शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक - सीबीसी-१०९६/प्र.क्र.४८/मावक-५, दि. ३ जून १९९६.**
**२) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक - सीबीसी-१०/२००१/प्र.क्र. १२०/मावक-५, दि. १ नोंव्हेंबर, २००१**

## प रि प त्र क

उपरोक्त शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्गातील व्यक्तींना जातीचे प्रमाणपत्र देण्याबाबतची कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. परंतु, बेडा जंगम, बुडगा जंगम, माला जंगम या जातीच्या लोकांना जातीची प्रमाणपत्रे वेळेवर दिली जात नाहीत अशा तक्रारी शासनाकडे प्राप्त झाल्या आहेत.

२. उपरोक्त शासन निर्णय, दिनांक १ नोव्हेंबर २००१ मध्ये जातीची प्रमाणपत्रे मिळविताना कोणकोणती कागदपत्रे सादर करावीत याबाबतच्या सूचना दिलेल्या आहेत. परंतू, शासनाच्या असे निर्देशनास आणले गेले आहे की, बेडा जंगम, बुडगा जंगम, माला जंगम या जातीच्या व्यक्तींना जातीची प्रमाणपत्रे वेळेवर दिली जात नाहीत. या संदर्भात शासन असे आदेश देत आहे की, अर्जदाराने जात प्रमाणपत्र मिळण्याकरिता अर्जासोबत आवश्यक ती कागदपत्रे / पुरावे सादर केल्यानंतर ती तपासून बेडा जंगम, बुडगा जंगम, माला जंगम या जातीच्या लोकांना जातीची प्रमाणपत्रे देण्यात यावीत. अर्जदाराने सादर केलेले पुरावे अपुरे वाटल्यास गृह चौकशी, स्थानिक चौकशी करावी.

**( कृ.मा.प.)**

२.	वरील सूचनेच्या अनुषंगाने अर्जदारास जातीचे प्रमाणपत्र देण्याबाबत टोलवाटोलवी करीत असल्याच्या शासनाकडे तक्रारी प्राप्त झाल्यास या विभागाचे शासन परिपत्रक, क्रमांक-सीबीसी-१०/२००१/प्र.क्र.१९०/मावक-५, दि. २१ जून २००१ मधील परिच्छेद-६ नुसार आपल्याविरुध्द कारवाई करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( वि. वा. मेहेर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**
**सर्व जिल्हाधिकारी,**
**सर्व उप जिल्हाधिकारी,**
**सर्व उप विभागीय अधिकारी (महसूल),**
**त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील तहसिलदारांना हयाबाबत सूचना द्याव्यात.**
**सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी**
**निवड नस्ती, का-मावक-५**